**राज्यात माहे जानेवारी ते फेब्रुवारी, २०२१ या कालावधीत झालेल्या गारपीट व अवेळी पावसामुळे शेतीपिकाच्या नुकसानीपोटी बाधित शेतकऱ्यांना मदत वाटपाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-०८२१/प्र.क्र. १०३/१८-स,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०७ ऑक्टोबर, २०२१

<u>वाचा</u> - १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस-२०१५/प्र.क्र.४०/म-३, दि.१३/०५/२०१५
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस-२०२१/प्र.क्र.६६/म-३, दि.११/०८/२०२१

**<u>प्रस्तावना :-</u>**

राज्यात माहे जानेवारी ते फेब्रुवारी, २०२१ या कालावधीत गारपीट व अवेळी पावसामुळे शेतीपिकांचे नुकसान झाल्याचे निदर्शनास आले होते. सदर नैसर्गिक आपत्तीमुळे शेतीपिकांचे नुकसान झाल्याने मंत्रिमंडळ उपसमितीच्या दिनांक १२/०५/२०२१ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार उपरोक्त वाचा (२) येथील शासन निर्णयान्वये बाधित शेतकऱ्यांना मदत देण्यासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद - २ मधील (v) अन्वये शेतीपिके व बहुवार्षिक पिकांच्या नुकसानीसाठीची मदतीची रक्कम खातेदाराच्या बँक खात्यावर थेट जमा करताना मदतीच्या रक्कमेमधून कोणत्याही बँकेने कोणत्याही प्रकारची वसुली करू नये. याकरीता सहकार विभागाने आवश्यक ते आदेश निर्गमित करण्याचे निर्देश दिले आहेत. सदर निर्देशाच्या अनुषंगाने विभागामार्फत आदेश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

माहे जानेवारी ते फेब्रुवारी, २०२१ या कालावधीत गारपीट व अवेळी पावसामुळे शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे नुकसान झाल्याने निधीचे वाटप करताना विविध दक्षता घेण्याचे महसूल व वन विभागाच्या वाचा येथील क्रमांक २ अन्वये निर्देश दिले आहेत.

उक्त निर्देशाच्या अनुषंगाने या परिपत्रकान्वये सूचित करण्यात येते की, गारपीट व अवेळी पावसामुळे शेतीपिके व बहुवार्षिक पिकाच्या नुकसानीसाठी वाटप केलेली मदतीची रक्कम खातेदारांच्या बँक खात्यावर जमा करताना मदतीच्या रक्कमेमधून कोणत्याही बँकेने कोणत्याही प्रकारची वसूली करू नये. याबाबतची अंमलबजावणी कटाक्षाने करण्यात येईल, याची सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दक्षता घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२११००७१५२२५२८२०२ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikrushna Anandrao Wadekar
Digitally signed by Shrikrushna Anandrao Wadekar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7305071c9d8b281074f8452b1a671851b99ce164d8bd282bfeb775611d0eb87e, pseudonym=A9B19E68D73171B69896843593789CD99AC6DBD5, serialNumber=2711D1231BE138057C3C88E0EFB4B1CD5177AA9E3C71FCD2EDF6EC025114EB89, cn=Shrikrushna Anandrao Wadekar
Date: 2021.10.07 15:23:59 +05'30'

**( श्रीकृष्ण वाडेकर )**
विशेष कार्य अधिकारी व सहनिबंधक, सहकारी संस्था,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.

२) मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
३) मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
४) मा. विधानसभा सदस्य व विधान परिषद सदस्य (सर्व)
५) अप्पर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
६) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) आयुक्त, कृषी संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) समन्वयक, राज्यस्तरीय बँकर्स समिती (SLBC) बँक ऑफ महाराष्ट्र, पुणे
१०) जिल्हाधिकारी( सर्व)
११) सह सचिव, भारत सरकार, कृषी मंत्रालय (सहकार विभाग) कृषी भवन, नवी दिल्ली.
१२) महाव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक, प्रादेशीक कार्यालय, पुणे
१३) मुख्य अधिकारी, आर. बी. आय, ॲग्रिकल्चरल क्रेडीट डिपार्टमेंट, सेंट्रल ऑफीस, गारमेंट हाऊस, मुंबई १८
१४) उप मुख्य अधिकारी, आर.बी. आय, ॲग्रिकल्चरल क्रेडीट डिपार्टमेंट, सेंट्रल ऑफीस, गारमेंट हाऊस, मुंबई १८
१५) विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था. (सर्व)
१६) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था. (सर्व)
१७) कार्यकारी संचालक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक (सर्व)
१८) प्रशासक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, मुंबई
१९) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२०) सर्व कार्यासने, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२१) निवड नस्ती - १८ स.